राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रात
क्षेत्रविकास कार्यक्रम राबविण्यासाठी अनुदान
वितरित करण्यास मंजुरी देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
अल्पसंख्यांक विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : क्षेविका-२०१५/प्र.क्र.३७/का.९
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २७ मार्च, २०१५.

**संदर्भ :-** १) शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग, क्षेविका-२०१४/प्र.क्र.५२/का.७, दि. २१ जून, २०१४.
२) शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग, क्षेविका-२०१४/प्र.क्र.१०१/का.९, दि. २३ जानेवारी, २०१५.

**शासन निर्णय :-**

अल्पसंख्याक विकास विभागाने सन २००८-०९ या वर्षापासून राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रांकरिता क्षेत्रविकास कार्यक्रम कार्यान्वित केला असून संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये ही योजना सन २०१४-१५ या वर्षात राबविण्यास मंजुरी देण्यात आली आहे.

२. या नागरी क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत संदर्भ क्र.२ अन्वये शासन निर्णयान्वये संबंधित जिल्ह्यातील महानगरपालिका/नगरपालिका/नगर पंचायती यांना रू. २०८.०२ लक्ष (अक्षरी रू. दोन कोटी आठ लक्ष दोन हजार फक्त ) एवढे अनुदान वितरित करण्यात आले आहे.

३. त्यानंतर क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत सन २०१४-१५ या वर्षात अनुदान मिळण्यासाठी राज्यातील विविध महानगरपालिका/नगरपालिका/नगर पंचायतींकडून शासनास प्राप्त झालेल्या प्रस्तावांची छाननी करण्यात आली. या योजनेसाठीच्या उर्वरित अनुदानातून छाननीअंती विहित निकषांनुसार अनुदान मिळण्यास पात्र ठरलेल्या महानगरपालिका / नगरपालिका/ नगरपंचायतींना या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट "अ" मध्ये दर्शविल्याप्रमाणे क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत रू. १,९९,११,८२०/-(अक्षरी रू. एक कोटी नव्व्यान्नव लक्ष अकरा हजार आठशे वीस फक्त) अनुदान मंजूर करण्यात येत असून हे अनुदान संबंधित महानगरपालिका /नगरपालिका/ नगरपंचायत ज्या जिल्हयांमध्ये स्थित आहेत, त्या जिल्हयांचे जिल्हाधिकारी यांच्या स्वाधीन करण्यात येत आहे.

४. संबंधित महानगरपालिका / नगरपालिका/ नगरपंचायतींना मंजूर करण्यात आलेले अनुदान वितरित करण्यासाठी संबंधित जिल्हाधिकारी नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

५. राज्यातील महानगरपालिका / नगरपालिका/ नगरपंचायतींनी मागणी केल्यानुसार ज्या विवक्षित प्रयोजनासाठी निधि मंजूर करण्यात आला आहे, केवळ त्याच प्रयोजनासाठी संबंधित महानगरपालिका / नगरपालिका/ नगरपंचायतींना निधी खर्ची टाकणे अनिवार्य आहे. संबधित जिल्हाधिकाऱ्यांकडून अनुदान वितरित करण्यात आल्यानंतर संबंधित महानगरपालिका / नगरपालिका/ नगरपंचायतींना सहा महिन्यांच्या कालावधीत प्रस्तावात नमूद केलेली कामे पूर्ण करणे आवश्यक आहे व याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे या शासन निर्णयाच्या परिशिष्ट "ब" मध्ये विहित केलेल्या नमुन्यात अल्पसंख्याक विकास विभागाकडे सादर करणे आवश्यक आहे. क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत राज्यातील महानगरपालिका / नगरपालिका/ नगरपंचायतींनी हाती घेतलेल्या विकासकामांच्या प्रगतीबाबत संनियंत्रण करुन त्याबाबतचा अहवाल संबंधित जिल्हाधिकारी यांनी शासनास सादर करावा.

६. या योजनेंतर्गत होणारा खर्च " मागणी क्र. झेडई-१ ए, मुख्यलेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०७) अल्पसंख्याक सकेंद्रित क्षेत्रातील क्षेत्र विकास कार्यक्रमाकरिता सहायक अनुदान (२२३५-ए-१३१) ३१ सहायक अनुदान" या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ या वर्षाकरिता मंजुर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

७. हे आदेश नियोजन विभागाच्या अनौचारिक संदर्भ क्रमांक- १५२/१४७५, दि. १०/०३/२०१५ तसेच वित्त विभागाच्या अनौचारिक संदर्भ क्रमांक- २५७/१५/व्यय-४, दि.१७/०३/२०१५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१५०३३०११५७०५००१४ असा आहे.हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

GANGURDE SANJAY SURYAKANT

Digitally signed by GANGURDE SANJAY SURYAKANT
DN: CN = GANGURDE SANJAY SURYAKANT, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = MINORITIES DEVELOPMENT,CID - 919995
Date: 2015.03.30 12:07:46 +05'30'

**(सं.सु.गांगुर्डे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
४) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,
५) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
६) महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा) , मुंबई / नागपूर,
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
९) संबंधित विभागीय आयुक्त,
१०) आयुक्त, नगरपालिका प्रशासन, मुंबई,
११) संबंधित जिल्हाधिकारी,
१२) आयुक्त, संबंधित महानगरपालिका,
१३) मुख्याधिकारी, संबंधित नगरपालिका,
१४) मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (अल्पसंख्याक विकास) यांचे खाजगी सचिव,
१५) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
*१६)* महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (प्रसिध्दीसाठी),
१७) निवडनस्ती,

शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग क्र.क्षेविका-२०१५/प्र.क्र. ३७ /का.९, दि. २७ मार्च, २०१५.

परिशिष्ट - "अ"

महाराष्ट्र राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रांकरिता क्षेत्र विकास कार्यक्रम
महानगरपालिका/नगरपालिकांचे जिल्हानिहाय निधी वितरणाचे विवरणपत्र.

| अ.क्र. | जिल्हा | म.न.पा. /न.पा./ न.पं. चे नाव | हाती घ्यावयाचे विकासकाम/ विकासकामे | शासन निर्णयानुसार अनुज्ञेय निधी (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १ | अहमदनगर | १) शिर्डी नगरपंचायत | १. शिर्डी येथील मुस्लिम कब्रस्तान संरक्षक भिंत बांधकाम करणे, भाग-४<br>२. शिर्डी येथील मुस्लिम कब्रस्तान इदगाह साठी संरक्षक भिंत बांधकाम करणे. | १०,००,०००/- |
| २ | | २) कोपरगाव न.प. | १. कोपरगाव स. न. २१३ (ब) ६ मधील ख्रिश्चन समाजाचे अंत्यविधीच्या जागेस संरक्षक भिंतीचे व पिण्याचे पाणी सुविधा व सांडपाण्याची व्यवस्था करणे<br>२. कोपरगाव सि. सं. नं. १६२७ चे जागेची दुरुस्ती व सांडपाण्याची व्यवस्था करणे | १०,००,०००/- |
| ३ | | ३) संगमनेर न.प. | सेंट मेरी चर्च येथील रोडवर पेव्हर ब्लॉक बसविणे बाबतचे काम | ९,९७,९१०/- |
| ४ | बुलढाणा | १)खामगाव न.प. | १. बर्डे प्लॉट मुस्लीम कब्रस्थान कंपाऊडवॉल बांधकाम करणे<br>२. बर्डे प्लॉट मध्ये न्याज मास्तर ते अयुब चौधरी ते शे. हारुण यांच्या घरापावेतो सिमेंट कॉंक्रीट नाली बांधकाम करणे<br>३. बर्डेप्लॉट मध्ये रसुल ठेकेदार ते शे. जब्बार यांच्या घरापावेतो कॉंक्रीट नाली बांधणे<br>४. बर्डेप्लॉट मध्ये इलियास मजिद ते इस्माईल शहा यांच्या घरापर्यंत सिमेंट कॉंक्रीट नाली बांधणे<br>५. बर्डेप्लॉट मध्ये इस्माईल शहा ते खुशिंदभाई यांच्या घरापर्यत सिमेंट कॉंक्रीट नाली बांधणे<br>६. बर्डेप्लॉट मध्ये शे. सलीम ते मुनाफभाई यांच्या घरापर्यत नाली बांधणे | १०,००,०००/- |
| ५ | बीड | १) माजलगाव न.प. | नूराणी मस्जिद येथून १.२ मी. रुंदीचा नाला (सिमेंट पाईप) व इतर कामे | १०,००,०००/- |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ६ | | २) धारुर न.प. | कासार तळे पूर्व बाजुकडील कब्रस्थानला संरक्षक भिंत बांधणे | १०,००,०००/- |
| ७ | धुळे | १) दोंडाईचे न.प. | रियाज शेख यांच्या घरापासून ते स्वामी विवेकानंद मार्गापर्यंत काँक्रीट रस्ता करणे (अंजुम थिएटर यांचे घरापर्यंत) | १०,००,०००/- |
| ८ | हिंगोली | १). हिंगोली न.प. | १. बी. टी. रोड करणे श्री कांबळे यांचे घंर ते श्री. नंदु धुळे यांचे घरापर्यंत प्र.क्र. १<br>२. सिमेंट रोड करणे रशिदभाई घर ते राजु घोले घर, दरबारभाई घर ते अंजुमभाई घर ते रुख्मीनी बदम घर, मासेदभाई ते पंचफुलाबाई इल्हाद P-००७ पर्यंत.<br>३.बाबाशा कब्रस्तान भोवती कंम्पाउंडवॉल बांधकाम करणे व दुरुस्ती करणे | ९,९०,२९८/- |
| ९ | | २). वसमत न.प. | १. प्र.क्र. १ विद्युत खांबावर LED लाईट बसविणे<br>२. प्र.क्र. ०२ मक्का मज्जीद परिसरात ०९ मी.उंचीचे विद्युत हायमास्ट बसविणे<br>३. प्र.क्र. ०४ मधील मन्नीयार गल्ली येथे पेव्हर ब्लॉक बसविणे<br>४. प्र.क्र. ०५ रविवार पेठ, सबणेचे घर ते शेख अयुबचे घर ते सांडेचे घर ते भागाराम कुरपटवार म्युझीकल बँड दुकान पर्यंत पेव्हर ब्लॉक बसविणे<br>५. प्र.क्र. ०६ मधील जवाहर कॉलोनी येथील मोबीन शेखचे घर सलीम शेख चे घरापर्यंत खडीकरण रस्ता बांधकाम करणे<br>६. प्र.क्र. ०७ मध्ये हर्षनगर येथील बौध्दविहार परिसर येथे ०९ मी. उंचीचा हायमास्ट बसविणे | १०,००,०००/- |
| १० | सांगली | १. आष्टा न.प. | लागोड बंध विहिर दुरूस्त करुन मुस्लिम समाजास पाण्याची व्यवस्था करणे | ९,९३,९५६/- |
| ११ | वाशिम | १. मंगरुळपीर न.प. | बशिर मास्तर यांचे घरापासून ते रमेश शृंगारे यांच्या घरापर्यंत रस्ता काँक्रीटीकरण करणे | १०,००,०००/- |
| १२ | | २. वाशिम न.प. | व्यंकटेश कॉलनी मधील अंतर्गत रस्त्यांचे खडीकरण करणे | ९,९९,५००/- |
| १३ | | ३. रिसोड न.प. | नगर परिषद प्रभाग क्र. २ मध्ये जाफरशहा यांचे घरापासून सलिमभाई | १०,००,०००/- |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | यांचे घरापर्यंत पेव्हर ब्लॉक रस्ता व नाली बांधकाम करणे | |
| १४ | रत्नागिरी | चिपळूण न.प. | प्रभाग क्र.४ खेड भागातील शाह घर ते लोटनशाह दर्गाकडे जाणारा रस्ता सिमेंट कॉंक्रीट करणे | ९,७२,१००/- |
| १५ | नांदेड | उमरी न.प. | उमरी न.प. वार्ड क्र. ०२ मध्ये रापतवार नगर भागातील बौध्द समाज मंदीराभोवती कुंपन भिंत बांधकाम व पिण्याच्या पाण्याची व्यवस्था करणे | १०,००,०००/- |
| १६ | नागपूर | सावनेर न.प. | १५ सावनेर येथील कब्रस्थान येथे आंतरिक रस्ते व उर्वरित आंतरिक बांधकाम | ९,६३,०४०/- |
| १७ | कोल्हापूर | कोल्हापूर म.न.पा. | १. प्र.क्र. ५२ अंतर्गत बाराईमाम दर्गा परिसरात संरक्षक भिंत व पत्रा शेड तसेच पेव्हींग ब्लॉक व गटार करणे<br>२. बागल चौक कब्रस्तान येथे स्ट्रीट लाईटची सोय करणे<br>३. ई प्र.क्र. १७ शिवाजीपार्कमध्ये संगम टॉकीज पिछाडीस (पोलंड) ख्रिश्चन दफन भूमी दुरुस्ती करणे<br>४. ई वॉर्ड बागल चौक कब्रस्थानमध्ये पत्राशेड उभा करणे | १९,९९,९१६/- |
| १८ | परभणी | १.मानवत न.प. | मानवत न.प. अंतर्गत प्रभाग क्र. ५ उक्कलगाव रस्तालगत मुस्लीम समाज कब्रस्तानास (इदगाह) उर्वरित सुरक्षाभिंतीचे बांधकाम | ९,९७,१००/- |
| १९ | | २.जिंतूर न.प. | जिंतूर न.प. अंतर्गत प्रभाग क्र.०१ मध्ये पठाण मोहल्ला येथे सांस्कृतिक सभागृहाचे बांधकाम करणेबाबत | ९,९८,०००/- |
| | | | **एकूण रू. १,९९,११,८२०/-** | |
| **एकूण रुपये (अक्षरी रू. एक कोटी नव्याान्नव लक्ष अकरा हजार आठशे वीस फक्त)** | | | | |

GANGURDE SANJAY SURYAKANT

Digitally signed by GANGURDE SANJAY SURYAKANT
DN: CN = GANGURDE SANJAY SURYAKANT, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = MINORITIES DEVELOPMENT,CID - 919995
Date: 2015.03.30 12:08:06 +05'30'

**( सं.सु.गांगुर्डे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र.क्षेविका-२०१५/प्र.क्र.३७/का.९, दि. २७ मार्च, २०१५.**

## परिशिष्ट - "ब"

## उपयोगिता प्रमाणपत्र

प्रमाणित करण्यात येते की, अल्पसंख्याक विकास विभागाने राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रांसाठी कार्यान्वित केलेल्या क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. क्षेविका-२०१५/प्र.क्र.३७/का-९, दि.२७ मार्च, २०१५ अन्वये वितरित केलेला रु.
(अक्षरी रु. ) एवढा निधी पुढील विकासकामांसाठी उपयोगात आणला आहे :-

| विकासकाम/ विकासकामे | वापरलेली रक्कम |
|---|---|
| अ. | रु. |
| ब. | रु. |
| क. | रु. |
| ड. | रु. |

असेही प्रमाणित करण्यात येते की, क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत ज्या निकष / अटींनुसार शासनाने अनुदान मंजूर केले होते, त्या निकष/ अटींची यथायोग्यरित्या पुर्तता करण्यात आली आहे. तसेच ज्या प्रयोजनाकरिता निधी मंजूर करण्यात आला होता, त्याच प्रयोजनाकरिता निधीचा प्रत्यक्षात विनियोग झाला आहे, याची खातरजमा करण्याकरिता मी खालील दस्तऐवज/अभिलेखांची तपासणी केली आहे :-

तपासणी केलेल्या दस्तऐवज/अभिलेखांचे प्रकार :-

१. प्रमाणक आणि पुस्तक लेखा (Vouchers and Book of Accounts)
२. मोजणी पुस्तके (Measurement Books)
३. सहायक अनुदान / कर्ज नोंदवही (Grant-in-aid/ Loan Register)
४. खर्च नोंदवही (Expenditure Register)

| आयुक्त, महानगरपालिका/ मुख्याधिकारी, नगरपालिका यांची स्वाक्षरी | संबंधित महानगरपालिका / नगरपालिका ज्या जिल्हयात स्थित आहेत त्या जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांची प्रतिस्वाक्षरी |
|---|---|
| नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा | नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा |

***